**“श्री क्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर ,भंडारा डोंगर,सदुंबरे पालखीतळ मार्ग क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करणे”, “गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे” आणि “वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे” या तीन तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांकरिता निर्माण करण्यात आलेली अस्थायी पदे पुढे चालु ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.६२/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२५.

**वाचा :-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१०/प्र.क्र.१०९/का.१४४४, दि. १२.०९.२०१४.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१८/प्र.क्र.६६/का.१४४४, दि. १३.११.२०१८.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२००९/प्र.क्र.८०/का.१४४४, दि. ०८.०३.२०१०.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४, दि. २०.०७.२०१७.
५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१०/प्र.क्र.१२३/का.१४४४, दि. ०३.०३.२०११.
६) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१५/१३/प्र.क्र.०३/का.१४४४, दि. २१.०२.२०१५.
७)नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०१३/१३/प्र.क्र.५८/का.१४४४, दि.०३.०९.२०२१ व समक्रमांकाचे शुध्दीपत्रक दि. २४.०३.२०२२.
८) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०२२/प्र.क्र.२३/का.१४४४, दि. २४.०३.२०२२
९) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०२२/प्र.क्र.२३/का.१४४४, दि. ०२.०९.२०२२.
१०) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवी-२०२३/प्र.क्र.२५/का.१४४४, दि. १४.०३.२०२३.
११) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.६२/का.१४४४-अ, दि. ०३.१०.२०२३
१२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२०२३/प्र.क्र.६२/का.१४४४-अ, दि. २३.०२.२०२४
१३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.३६/का.१४४४-अ, दि.०२.०७.२०२४
१४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.६२/का.१४४४-अ, दि.१९.०९.२०२४

**शासन निर्णय :-**

“श्रीक्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, सदुंबरे पालखीतळ मार्ग क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करणे या तीर्थक्षेत्र विकास आराखड्या”तील कामांचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्यासाठी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या आस्थापनेवर "विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे” यांच्या कार्यालयासाठी निर्माण करण्यात आलेल्या ३ अस्थायी पदांना तसेच “श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे” व “वंदनीय राष्ट्रसंत

तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे" या २ तीर्थक्षेत्र विकास आराखड्यातील कामांचे संनियंत्रण व अंमलबजावणीसाठी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या आस्थापनेवर "विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती" यांच्या कार्यालयासाठी निर्माण करण्यात आलेल्या ६ अस्थायी पदांना अशा खालील एकुण ०९ अस्थायी पदांना उपरोक्त वाचा क्र.१४ येथील शासन निर्णयान्वये २८ फेब्रुवारी, २०२५ पर्यंत चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आली आहे. आता सदरहू ०९ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२५ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२५ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| विकास आराखड्याचे नाव | कार्यालयाचे नाव | पदनाम व वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. श्रीक्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, सदुंबरे, पालखीतळ मार्ग विकास आराखडा. | विभागीय आयुक्त, पुणे विभाग | विशेष कार्य अधिकारी<br>S-२५, ७८८००-२०९२०० | १ |
| | | संशोधन अधिकारी<br>S-१४, ३८६००-१२२८०० | १ |
| | | लिपिक-टंकलेखक<br>S-६, १९९००-६३२०० | १ |
| २. श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे<br>३. वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे. | विभागीय आयुक्त, अमरावती विभाग | विशेष कार्य अधिकारी<br>S-२३, ६७७००-२०८७०० | २ |
| | | सहायक संशोधन अधिकारी<br>S-१४, ३८६००-१२२८०० | २ |
| | | लिपिक-टंकलेखक<br>S-६, १९९००-६३२०० | २ |
| **एकुण पदे** | | | **९** |

२. "श्रीक्षेत्र देहू, आळंदी, पंढरपूर, भंडारा डोंगर, सदुंबरे पालखीतळ मार्ग क्षेत्रातील मुलभूत सुविधा निर्माण करणे" या तीर्थक्षेत्र विकास आराखड्या"तील कामांचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या उपरोक्त ३ अस्थायी पदांच्या वेतनावर व भत्यांवर होणारा खर्च तसेच " श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवा निमित्त शेगाव क्षेत्रात मुलभूत सुविधा निर्माण करणे" व "वंदनीय राष्ट्रसंत तुकडोजी महाराज मोझरी, जिल्हा अमरावती येथे मुलभूत सुविधा निर्माण करणे" या २ तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या उपरोक्त ६ अस्थायी पदांच्या वेतनावर व भत्यांवर होणारा खर्च "मागणी क्र. ओ-८, ३४५२, पर्यटन, ०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्रे," या लेखाशिर्षाखालील संबंधित उपशिर्षांतर्गत खर्ची टाकून, " (०१) वेतन", या उद्दीष्टाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३१३१५०९३०५४१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANDKUMAR GANGARAM RAUT

Digitally signed by NANDKUMAR GANGARAM RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2364c4585e9e2f4e1a3eb4e4ad8e29fd11241a0ac1929b933f28fc39d2906d11, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EFAB5769910D3540376EC2062B6C2A6B1BD6E7BC121FF37D75E24F4318761C66, cn=NANDKUMAR GANGARAM RAUT
Date: 2025.03.13 15:10:16 +05'30'

**(नंदकुमार राऊत)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र - १, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
८) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रशासकीय इमारत, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
९) वित्त विभाग (व्यय-८)/आ.पु.क, मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग, का-१४२४/का-१४२१/का-१४२६/का-१४२७, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती का.१४४४-अ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.